**केंद्र शासनाच्या स्वच्छ भारत अभियान (नागरी) च्या धर्तीवर राज्यामध्ये “स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी)” राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः स्वभाअ २०१५/ प्र.क्र.२३/ नवि ३४**
शहीद भगतसिंग चौक, मदाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक :१५ मे, २०१५

**वाचा -**

१) केंद्र शासनाच्या स्वच्छ भारत अभियान (नागरी)च्या डिसेंबर, २०१४ मध्ये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना.
२) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक-स्वभाअ-२०१५/प्र.क्र.२३/ नवि-३४,दिनांक २४ एप्रिल, २०१५

**प्रस्तावना:**

देशातील सर्व शहरांमधील नागरिकांना स्वच्छ पर्यावरण व चांगले आरोग्य मिळावे या करिता या शहरांना स्वच्छतेची आणि या शहरामधील सर्व नागरीकांना शौचालयांची सुविधा उपलब्ध करून देवून हे ध्येय गाठण्यासाठी केंद्र शासनाने स्वच्छ भारत अभियान संपूर्ण देशामध्ये राबविण्याची घोषणा केली आहे. त्यानुसार, हे अभियान २ ऑक्टोंबर, २०१४ पासून राष्ट्रपिता महात्मा गांधी यांच्या १५० व्या जन्मदिनापर्यंत म्हणजे २ ऑक्टोंबर २०१९ पर्यंत संपूर्ण देशात राबविण्यात येत आहे. स्वच्छ भारत अभियान (नागरी) देशामध्ये एक अभियान म्हणून राबविण्यासाठीच्या मार्गदर्शक सूचना केंद्र शासनाने प्रसिध्द केल्या आहेत.

२. सन २०११ च्या जनगणनेनुसार राज्याची नागरी लोकसंख्या ५,०८,२७,५३१ (राज्याच्या एकूण लोकसंख्येच्या ४५.२३ %) एवढी आहे. तर, नागरी भागातील एकूण कुटुंबांची संख्या १,०८,१३,९२८ एवढी आहे. त्यापैकी साधारण २९% कुटुंबांना शौचालयाची सुविधा उपलब्ध नाही. शौचालयाची सुविधा उपलब्ध नसलेल्या कुटुंबांपैकी साधारण ७३% कुटुंबे सार्वजनिक शौचालयांचा वापर करीत आहेत. तर, साधारण २७% कुटुंबे उघडयावर शौचालयास जात आहेत.

३. राज्यात २६ महानगरपालिका व २३९ नगरपरिषदा अशा एकूण २६५ नागरी स्थानिक स्वराज्य संस्था असून, या सर्व नागरी स्थानिक संस्थांमधून दर दिवशी निर्माण होणाऱ्या

घनकचऱ्याची आधुनिक व शास्त्रशुध्द पध्दतीचा अवलंब करून फारच थोडया शहरांमध्ये विल्हेवाट लावली जात आहे. त्यामुळे, संबंधित महानगरपालिका / नगरपालिका क्षेत्रामध्ये पर्यावरण विषयक व नागरीकांच्या आरोग्य विषयक समस्या निर्माण होत आहेत. मा. नॅशनल ग्रीन ट्रिब्यूनलने व मा. उच्च न्यायालयाने या घनकचऱ्याची योग्य व शास्त्रोक्त पध्दतीचा अवलंब करून विल्हेवाट लावण्याबाबत योजना तयार करण्याबाबत राज्य शासनास व महानगरपालिका तसेच नगरपालिकांना निर्देश दिलेले आहेत.

४. केंद्र शासनाच्या स्वच्छ भारत अभियान (नागरी) च्या मार्गदर्शक सूचनांनुसार राज्यामधील सर्व शहरांमधील उघडयावर शौचालयास जात असलेल्या कुटुंबांना शौचालयाची व्यवस्था उपलब्ध करून देण्यासाठी व शहरांमधील घनकचऱ्याचे व्यवस्थापन करण्यासाठी राज्यामध्ये “स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी)” राबविण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय:**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबींचा विचार करून, केंद्र शासनाच्या स्वच्छ भारत अभियान (नागरी) च्या धर्तीवर राज्यामध्ये “स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी)” हे एक अभियान म्हणून राबविण्यास शासन मान्यता देत आहे. केंद्र शासनाच्या स्वच्छ भारत अभियान (नागरी) च्या मार्गदर्शक सूचनांनुसार या अभियानाची अंमलबजावणी राज्यामध्ये करण्यात येईल व या अभियानाचा कालावधी २ ऑक्टोबर, २०१९ पर्यंत राहील.

२. सदर अभियानातील घटकांची अंमलबजावणी नगर विकास विभाग व पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामार्फत पुढील प्रमाणे संयुक्तपणे करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(१) वैयक्तीक घरगुती शौचालय, सामुहिक शौचालय व सार्वजनिक शौचालय बांधकाम :**

**(अ) नगर विकास विभाग:**

सर्व महानगरपालिका तसेच - “अ” वर्ग व - “ब” वर्ग नगरपालिकां मधील शौचालय बांधकाम व त्यासाठी आवश्यक क्षमता बांधणी, प्रचार, प्रसार व प्रसिध्दि आणि जनजागृती.

**(ब) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग :**

“क” वर्ग नगरपालिका व नगरपंचायती मधील शौचालयांचे बांधकाम व त्यासाठी आवश्यक क्षमता बांधणी, प्रचार, प्रसार व प्रसिध्दि आणि जनजागृती.

**(२) नागरी घनकचरा व्यवस्थापन :**

संपूर्णपणे नगर विकास विभाग मार्फत राबविण्यात येईल.

३ केंद्र शासनाच्या स्वच्छ भारत अभियान (नागरी) च्या धर्तीवर स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) ची राज्यामधील अंमलबजावणी खालील प्रमाणे करण्यात येईल:-

३.१ **अभियानाचा उद्देश :**

**(१)** उघडयावरील शौचविधी बंद करणे.

(**२**) हाताने मैला उचलणाऱ्या सफाई कामगारांना या कामातून मुक्त करणे.

(**३**) नागरी घनकचरा व्यवस्थापनासाठी आधुनिक व शास्त्रोक्त पध्दतीचा अवलंब करणे.

(**४**) स्वच्छतेच्या चांगल्या पद्धतीच्या अनुषंगाने सवयींमध्ये बदल करणे.

(**५**) स्वच्छते विषयी जागरूकता निर्माण करणे आणि त्याची सार्वजनिक आरोग्याशी सांगड घालणे.

(**६**) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांची क्षमता वाढविणे.

(**७**) भांडवली खर्च आणि ऑपरेशन आणि देखभाल यासाठी खाजगी संस्थांच्या सहभागासाठी सुयोग्य वातावरण निर्माण करणे.

३.२ **अभियानाचे धोरण :**

(१) स्वच्छतेचा व्यापक आराखडा ज्यामध्ये- :

(i) शहर स्तरावरील स्वच्छतेचा आराखडा.

(ii) राज्याची स्वच्छतेची संकल्पना.

(iii) राज्याचे स्वच्छतेचे धोरण.

(२) सवयींमध्ये बदलाचे धोरण आणि माहिती, शिक्षण व संपर्क.

(३) खाजगी संस्थांच्या सहभागासाठी सुयोग्य वातावरण निर्माण करणे.

(४) क्षमता बांधणी.

(५) विशेष लक्ष केंद्रित करणे-

(i) नागरी भागातील हाताने मैला उचलणाऱ्या सर्व सफाई कामगांरांचा शोध घेवून ते काम करीत असलेल्या इन-सॅनिटरी शौचालयांचे सॅनिटरी शौचालयामध्ये रूपांतर करून त्या मैला सफाई कामगारांना या कामामधून

मुक्त करून त्यांचे पुनर्वसन करणे.

(ii) घनकचरा व्यवस्थापनात काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या (rag pickers) कामाच्या स्थितीत सुधारणा करणे.

(iii) स्थलांतरीतांसाठीच्या सर्व तात्पुरत्या निवासस्थानात व शहरी बेघरांसाठीच्या निवासस्थानात शौचालयाची पुरेशी व्यवस्था करणे.

(iv) शहरी भागातील बांधकामांवर काम करणाऱ्या कामगारांना तेथेच तात्पुरत्या शौचालयाची सुविधा उपलब्ध करण्याचे अनिवार्य करणे.

(v) सेवानिवृत्त, लहान मुली, गर्भवती व स्तनदा माता यांच्यासाठी वैयक्तीक घरगुती शौचालय बांधकामामध्ये प्राधान्य देणे.

३.३ **अभियानाचे घटक :**

**(अ) वैयक्तीक घरगुती शौचालय :**

(१) राज्यामधील सर्व शहरात कोणतेही कुटुंब उघडयावर शौचालयास जाणार नाही, अभियान कालावधीत नवीन इन- सॅनिटरी शौचालयांचे बांधकाम करण्यात येणार नाही आणि एक शौचकुप शौचालयाचे (Pit Latrine) सॅनिटरी शौचालयामध्ये रूपांतरीत करणे ही या अभियानातील वैयक्तीक घरगुती शौचालय या घटकाची मुख्य उद्दिष्टे आहेत.

(२) मुंबई महानगरपालिका वगळता इतर सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमधील पात्र लाभार्थी कुटुंबास वैयक्तीक घरगुती शौचालय बांधकामासाठी एकूण रू १२,०००/- प्रति शौचालय एवढे केंद्र व राज्य शासनाचे मिळून अनुदान अनुज्ञेय राहील. या अनुदानापैकी रू ४००० एवढे केंद्र शासनाचे तर, रू ८००० राज्य शासनाचे राहतील.

(३) मुंबई महानगरपालिकेमधील पात्र लाभार्थी कुटुंबास वैयक्तीक घरगुती शौचालय बांधकामासाठी रू ५,०००/- प्रति शौचालय एवढे केंद्र व राज्य शासनाचे मिळून अनुदान अनुज्ञेय राहील. या अनुदानापैकी रू ४००० एवढे केंद्र शासनाचे तर, रू १००० राज्य शासनाचे राहतील.

केंद्र व राज्य शासना मार्फत उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या उपरोक्त अनुदान व्यतिरिक्त उर्वरित अनुदान या शासन निर्णयाच्या परिच्छेद ३.४ मध्ये नमूद केलेल्या स्त्रोता मधून उपलब्ध करून देण्यात यावे.

(४) वैयक्तीक घरगुती शौचालय बांधाकामासाठी पात्र कुटुंबे :-

(i) शौचालयाची सुविधा उपलब्ध नसल्याने उघडयावर शौचालयास जाणारीकुटुंबे. (शौचालयाची सुविधा उपलब्ध नसल्याने उघडयावर शौचालयास जाणारी सर्व कुटुंबे वैयक्तीक घरगुती शौचालय मिळण्यासाठी पात्र आहेत. या पात्र कुटुंबापैकी वैयक्तीक घरगुती शौचालय बांधण्यासाठी ज्यांच्याकडे जागा उपलब्ध आहे अशा कुटुंबांना वैयक्तीक घरगुती शौचालयाची सुविधा उपलब्ध करून देण्यात येईल. तर,ज्या कुटुंबांकडे वैयक्तीक घरगुती शौचालय बांधकामासाठी जागा उपलब्ध नाही,अशा कुटुंबांना सामुदायिक शौचालयामध्ये समाविष्ट करून शौचालयाची सुविधा उपलब्ध करून देण्यात येईल.)

(ii) इन-सॅनिटरी शौचालयाचा वापर करीत असलेली सर्व कुटुंबे.

(iii) एक शौचकुपाचे शौचालयाचा वापर करीत असलेली सर्व कुटुंबे.

(iv) वरील (i) ते (iii) व्यतिरिक्त कोणतीही पात्रता अनुज्ञेय राहाणार नाही.

(५) वैयक्तीक घरगुती शौचालय बांधाकामासाठी लाभार्थ्यांनी स्वत: पुढाकार घ्यावा यासाठी सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी प्रथमत: जनजागृती करण्यात यावी.

(६) सन २०११ च्या जनगणनेमधील उघडयावर शौचालयास जात असलेल्या कुटुंबांची आकडेवारी किंवा यासंदर्भातील अलीकडील सर्वेक्षणात उपलब्ध असलेली आकडेवारी विचारात घेवून घरो-घरी जावून सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थां मार्फत सर्वेक्षण करून या सर्वेक्षणातील माहिती सार्वजनिक डोमेनवर उपलब्ध करण्यात यावी. सर्वेक्षणातील या माहिती संदर्भात प्राप्त झालेले सर्व दावे व हरकती यांचा पारदर्शक पध्दतीने विचार करावा. या सर्वेक्षणातील माहिती वेळोवेळी सुधारित करण्यात यावी.

(७) या बेसलाईन सर्वेक्षणाच्या आधारे नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी उघडयावर शौचालयास जात असलेल्या कुटुंबांची संख्या निश्चित करून घ्यावी व त्या कुटुंबांना वैयक्तीक घरगुती शौचालय मंजूर करण्याबाबत किंवा जागेच्या उपलब्धते अभावी त्यांना सामुहिक शौचालय उपलब्ध करून द्यावयाचे याबाबतचा आराखडा तयार करून त्यानुसार अंमलबजावणी सुरू करावी.

(८) बेसलाईन सर्वेक्षणातील माहिती प्राप्त होईपर्यंत सन २०११ च्या जनगणने मधील आकडेवारीच्या आधारे अथवा अलीकडील सर्वेक्षणातील माहितीच्या आधारे शौचालयाची सुविधा उपलब्ध नसल्याने उघडयावर शौचालयास जात असलेल्या कुटुंबांना शौचलयाची सुविधा उपलब्ध करून देण्याबाबतची कार्यवाही तात्काळ सुरू करण्यात यावी.

(९) या योजनेमधील लाभार्थी अधिकृत / अनधिकृत वसाहतीमध्ये राहत असतील अथवा अधिसूचित केलेल्या / अधिसूचित न केलेल्या झोपडपट्टीमध्ये राहत असतील तरी त्यांना शौचालयाची सुविधा उपलब्ध करून देण्यात यावी.

(१०) ज्या कुटुंबाकडे शौचालय सुविधा उपलब्ध नाही अशा लाभार्थी कुटुंबाने शौचालयाची सुविधा उपलब्ध होण्यासाठी साध्या कागदावर अर्ज करून तो हमीपत्रासह संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेकडे पाठविल्यास त्या अर्जाची ७ दिवसात तपासणी करून संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने निर्णय घ्यावा.

(११) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडे अशा प्रकारे प्राप्त झालेल्या अर्जास मंजूरी दिल्यानंतर केंद्र शासनाच्या हिस्यापैकी ५० टक्के (रू. २०००) व राज्य शासनाच्या हिस्यापैकी ५० टक्के ( मुंबई महानगरपालिका वगळून इतर नागरी स्थानिक स्वराज्य संस्थां मधील लाभार्थी कुटुंबासाठी रू ४००० तर, मुंबई महानगरपालिके मधील लाभार्थी कुटुंबांसाठी रू. ५००) एवढे अनुदान संबंधित लाभार्थी कुटुंबास पहिला हप्ता म्हणून मंजूर करण्यात यावे.

(१२) वैयक्तीक घरगुती शौचालयाचे बांधकाम करावयाच्या जागेपासून ३० मिटर पर्यंतच्या अंतरावर मलनिस्सारण सुविधा उपलब्ध असल्यास फक्त शौचालयाचा पाया व पायाच्या वरील बांधकाम (Superstructure) करून अस्तित्वात असलेल्या

मलनिस्सारण सुविधेस ते शौचालय जोडण्यात यावे. तर, ३० मिटर पर्यंतच्या अंतरावर मलनिस्सारण सुविधा उपलब्ध नसल्यास शौचालयाचा पाया व पायाच्यावरील बांधकामा सोबत दोन पिट, सेफ्टीक टँक, बायो-डायजेस्टर किंवा बायो टँक बांधुन मैल्यावर प्रक्रियेची सुविधा उपलब्ध करून देण्यात यावी.

(१३) इन-सॅनिटरी शौचालयाचा अथवा एक शौचकुप शौचालयाचे सॅनिटरी शौचालयात रूपांतर करावयाचे असल्याने अश्या शौचालयाचा वापर करीत असलेल्या कुटुंबांच्या शौचालया जवळ मलनिस्सारण सुविधा उपलब्ध असल्यास ते त्या मलनिस्सारण सुविधेस जोडण्यात यावे अथवा दोन पिट, सेफ्टीक टँक, बायो-डायजेस्टर किंवा बायो टँक बांधुन मैल्यावर प्रक्रियेची सुविधा उपलब्ध करून देण्यात यावी.

(१४) या अभियांनांतर्गत बांधण्यात येणारी वैयक्तीक घरगुती शौचालये पाणी पुरवठयाच्या सुविधेसह बांधण्यात येतील याबाबत सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी काळजी घ्यावी. वैयक्तीक घरगुती शौचालयाच्या देखभाल व दुरूस्तीची जबाबदारी संबंधित लाभार्थी कुटुंबाची राहील.

(१५) वैयक्तीक घरगुती शौचालय बांधकामाची अंतिम तपासणी, स्थळ आधारित तंत्रज्ञानाने करण्यात यावी. (Location base technology) अर्जदार व शौचालयाचे बांधकाम यांचा भौगोलिक टॅग केलेला स्वयं साक्षांकित फोटो (Self attested geo-tagged photograph) काढण्यात यावा. सदर फोटो स्वच्छ भारत अभियान (नागरी) व स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) च्या एम.आय.एस. वर अपलोड करण्यात यावा.

(१६) त्यानंतर केंद्र व राज्य हिस्याचा उर्वरित निधीचा दुसरा हप्ता देण्यात यावा.

(१७) या घटका अंतर्गत लाभार्थ्याचे सर्व प्रकारचे अनुदान (केंद्र व राज्य सरकारचे आणि / किंवा खाजगी) बँकेमध्ये लाभार्थी कुटुंबांच्या खात्यावर (प्रधानमंत्री जन धन योजने अंतर्गत उघडण्यात आलेल्या खात्यांचा समावेश आहे) (इलेक्ट्रॉनिक क्लिअरिंग सेवेव्दारे) थेट जमा करण्यात यावे. रोख / धनादेशाव्दारे प्रदान करण्यात येवू नये.

(१८) लाभार्थ्यास अनुदानाची रक्कम वेळेवर आणि सुलभपणे हस्तांतरीत होईल याची काळजी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने घ्यावी.

(१९) वैयक्तीक घरगुती शौचालयांसाठीचे विविध तांत्रिक पर्याय व त्यासाठीचा अंदाजित खर्च यांचा तपशील केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनां सोबतच्या जोडपत्र-२ मध्ये देण्यात आला आहे.

**(ब) सामुदायिक शौचालय :**

(१) शहरात शौचालयाची सुविधा उपलब्ध नसल्यामुळे उघडयावर शौचालयास जात असलेल्या कुटुंबापैकी २० टक्के कुटुंबांकडे वैयक्तीक घरगुती शौचालयाचे बांधकाम करण्यासाठी पुरेशी जागा उपलब्ध नसल्याने पर्याय म्हणून या कुटुंबांना सामुदायिक शौचालयाची सुविधा उपलब्ध करून द्यावी लागणार आहे.

(२) या घटकांतर्गत पात्र लाभार्थी म्हणजे शौचालयाची सुविधा उपलब्ध नसल्यामुळे उघडयावर शौचालयास जात असलेली कुटुंबे ज्यांना वैयक्तीक घरगुती शौचालय बांधकाम करण्यासाठी जागा उपलब्ध नाही.

(३) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने अशी कुटुंबे शोधून त्यांचा गट तयार करावा. अशा कुटुंबांचा शोध घेण्यासाठी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने स्थानिक स्वयंसेवी संस्था, वार्ड / मोहल्ला सभा इत्यादी पध्दतींचा वापर करावा.

(४) योग्य संख्ये एवढया लाभार्थी कुटुंबांचा गट झाल्यानंतर नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या घरांच्या जवळच योग्य अशी जागा निवडावी. जागेचे लाभ देवून किंवा रूफ टॉप यांचा वापर करून आवश्यक निधी उपलब्ध करण्याचा प्रयत्न करावा.

(५) सामुदायिक शौचालय युनिट मध्ये आवश्यक असलेल्या संख्येनुसार शौचालयांची संख्या असेल, पाया (Substructure) (जागेवरील प्रक्रीयेचा किंवा भूमिगत गटार / मलनिस्सारण प्रक्रीयेस जोडणी यापैकी एकाचा समावेश असावा), पायाच्या वरील बांधकाम (Superstructure), पाण्याची टाकी आणि हात धुण्याची व्यवस्था असावी.

(६) पुरुष व महिला यांच्यासाठी स्वतंत्र शौचालय आणि आंघोळीसाठी व्यवस्था असावी आणि अंध व अपंग यांच्यासाठी आवश्यक सुविधा असाव्यात. (उदा. रॅम्प, ब्रेल माहिती फलक, इत्यादी)

(७) सामुदायिक शौचालय बांधकाम करावयाच्या जागेपासून ३० मिटर पर्यंतच्या अंतरावर मलनिस्सारण सुविधा उपलब्ध असल्यास फक्त शौचालयाचा पाया व पायाच्या वरील बांधकाम (Superstructure) करून अस्तित्वात असलेल्या मलनिस्सारण सुविधेस ते शौचालय जोडण्यात यावे. तर, ३० मिटर पर्यंतच्या अंतरावर मलनिस्सारण सुविधा उपलब्ध नसल्यास शौचालयाचा पाया व पायाच्यावरील बांधकामा सोबत दोन पिट, सेफ्टीक टँक, बायो-डायजेस्टर किंवा बायो टँक बांधुन मैल्यावर प्रक्रियेची सुविधा उपलब्ध करून देण्यात यावी.

(८) या अभियांनांतर्गत बांधण्यात येणारी सामुदायिक शौचालये पाणी पुरवठयाच्या सुविधेसह बांधण्यात येतील याबाबत सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी दक्षता घ्यावी.

(९) अशा प्रकारे बांधण्यात आलेल्या सामुदायिक शौचालयाच्या युनिटच्या देखभाल दुरूस्तीचा ५ वर्षाचा करार करण्यात यावा.

(१०) या योजनेमधील लाभार्थी अधिकृत / अनधिकृत वसाहतीमध्ये राहत असतील अथवा अधिसूचित केलेल्या / अधिसूचित न केलेल्या झोपडपट्टीमध्ये राहत असतील तरी त्यांना शौचालयाची सुविधा उपलब्ध करून देण्यात यावी.

(११) सामुदायिक शौचालयाचा प्रकल्प नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने तयार करून त्यांच्यास्तरावर मंजूर करावा.

(१२) या संपूर्ण प्रकल्पासाठी मान्यता आणि खरेदी प्रक्रिया इत्यादीसाठी शासनाने यापूर्वी ठरवून दिलेल्या प्रचलित कार्यपध्दतीचे पालन संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी करावे.

(१३) प्रत्येक सामुदायिक शौचालयाच्या युनिट करिता येणाऱ्या खर्चाच्या ४० टक्के अथवा व्यवहार्यता अंतर निधी (Viability gap funding) केंद्र शासन उपलब्ध करून

देईल. तर, राज्य शासन केंद्र शासनाने उपलब्ध करून दिलेल्या निधीच्या किमान २५ टक्के एवढा निधी उपलब्ध करून देईल. उर्वरित निधी या शासन निर्णयाच्या परिच्छेद ३.४ मध्ये नमूद केलेल्या स्त्रोतांमधून उपलब्ध करून घेण्यात यावा.

(१४) सामुदायिक शौचालयांसाठीचे विविध तांत्रिक पर्याय व त्यासाठीचा अंदाजित खर्च यांचा तपशील केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनां सोबतच्या जोडपत्र-२ मध्ये देण्यात आला आहे.

**(क) सार्वजनिक शौचालय :**

(१) अभियानांतर्गत प्रत्येक शहरातील तरंगती लोकसंख्या (Floating Population) असलेल्या सार्वजनिक ठिकाणी उदा. बाजार, रेल्वे स्टेशन, बस स्टेशन, पर्यटन स्थळे, कार्यालय संकुल इत्यादी ठिकाणी पुरेशा संख्येने सार्वजनिक शौचालये बांधण्यात येतील याची दक्षता सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी घ्यावी.

(२) सार्वजनिक शौचालय बांधकामासाठी केंद्र शासनाचे व राज्य शासनाचे अनुदान अनुज्ञेय राहणार नाही. यास्तव, सार्वजनिक शौचालये “सार्वजनिक खाजगी सहभाग” (PPP) पध्दतीने बांधण्यात यावीत. यासाठी सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी शहरांमधील तरंगती लोकसंख्या असलेल्या ठिकाणी सार्वजनिक शौचालयांची सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी जागा निवडावी. सदर जागेवर सार्वजनिक शौचालयाचे बांधकाम करून त्याची देखभाल करण्यासाठी जागेचे लाभ, जाहिरात याबाबी खाजगी क्षेत्राला आकर्षीत करण्यासाठी देण्यात यावेत.

(३) या अभियांनांतर्गत बांधण्यात येणारी सार्वजनिक शौचालये पाणी पुरवठयाच्या सुविधेसह बांधण्यात यावीत. पुरुष व महिला यांच्यासाठी स्वतंत्र शौचालयाची तरतूद असावी आणि अंध व अपंग यांच्यासाठी आवश्यक सुविधा असाव्यात. (उदा. रॅम्प, ब्रेल माहिती फलक, इ) अशा प्रकारे बांधण्यात आलेल्या सार्वजनिक शौचालयाच्या युनिटच्या देखभाल दुरूस्तीचा ५ वर्षाचा करार करावा.

(४) या संपूर्ण प्रकल्पासाठी मान्यता आणि खरेदी प्रक्रिया इत्यादीसाठी शासनाच्या प्रचलित कार्यपध्दतीचे पालन संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी करावे.

(५) सार्वजनिक शौचालयांसाठीचे विविध तांत्रिक पर्याय व त्यासाठीचा अंदाजित खर्च यांचा तपशील केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनां सोबतच्या जोडपत्र-२ मध्ये देण्यात आला आहे.

**(ड) घनकचरा व्यवस्थापन:**

(१) नागरी घनकचरा व्यवस्थापनांतर्गत कचरा निर्मितीच्या जागीच वेगवेगळा करून गोळा करणे, साठविणे, वाहतूक, प्रक्रिया करणे व उर्वरित कचऱ्याची शास्त्रशुध्द विल्हेवाट लावणे या बाबींचा समावेश आहे.

(२) प्रत्येक नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने शहर स्वच्छता आराखडयामध्ये आढळून आलेल्या शहराच्या गरजा ओळखून, नागरी घनकचरा (व्यवस्थापन व हाताळणी) नियम, २००० व केंद्रिय नगर विकास मंत्रालयाने वेळोवळी सुधारीत केलेले नियम विचारात घेवून घन कचरा व्यवस्थापनासाठी शहराचा सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) तयार करावा.

(३) शहर स्वच्छता आराखडयामध्ये आढळून आलेल्या शहराच्या गरजा ओळखून तयार केलेला सविस्तर प्रकल्प अहवाल हा बँकग्राहय व व्यवहार्य आर्थिक मॉडेल असावे. तसेच, राष्ट्रीय नागरी स्वच्छता कार्यक्रम २००८ (NUSP-२००८) मधील उद्दिष्टानुसार असावा. खाजगी गुंतवणूकीस आकर्षीत करण्यासाठी लहान शहरांचे क्लस्टर करण्यात यावे. प्रकल्पाची देखभाल व दुरूस्ती ही सविस्तर प्रकल्प अहवालाचा भाग असेल.

(४) सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठी येणाऱ्या खर्चाच्या १०० टक्के अनुदान केंद्र शासन देणार आहे. हे अनुदान राष्ट्रीय सल्लागार आणि आढावा समितीने (NARC) ठरवून दिलेल्या नियमानुसार युनिट खर्चावर आधारीत असेल. .

(५) प्रकल्प अहवालातील एकूण किंमतीच्या २० टक्के अथवा व्यवहार्यता अंतर निधी (Viability gap funding) केंद्र शासन उपलब्ध करून देणार आहे. केंद्र शासनाने उपलब्ध करून दिलेल्या निधीच्या २५ टक्के एवढा निधी राज्य शासन उपलब्ध करून देईल. उर्वरित निधी या शासन निर्णयाच्या परिच्छेद ३.४ मध्ये नमूद स्त्रोता मधून

उपलब्ध करून घेण्यात यावा. घनकचऱ्यापासून उर्जा निर्मिती प्रकल्पांचा प्रसार करण्यासाठी, केंद्र शासनाच्या अनुदानाचा / व्यवहार्यता अंतर निधी (Viability gap funding) चा वापर करण्यात यावा.

(६) सदर प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना मदत व्हावी म्हणून या क्षेत्रातील खाजगी अथवा शासकीय संस्थांचे पॅनेल राज्य शासन तयार करील. या संस्थांमार्फत करण्यात येणाऱ्या मुल्यमापनाचा खर्च केंद्रिय नगर विकास मंत्रालयाने मान्य केलेल्या नियमानुसार प्रशासकीय खर्चासाठी उपलब्ध होणाऱ्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

(७) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी शिफारस केलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालाचे तांत्रिक आणि आर्थिक मुल्यमापन करण्यासाठी राष्ट्रीयस्तरावरील मान्यवर संस्थांना राज्यस्तरीय उच्चाधिकार समिती मार्फत प्राधिकृत करण्यात येईल. या संस्थांनी केलेल्या शिफारशीच्या आधारे राज्यस्तरीय उच्चाधिकार समिती घनकचरा व्यवस्थापानासाठी तयार केलेले सविस्तर प्रकल्प अहवाल व आर्थिक मॉडेलला मान्यता देईल. प्रकल्पास यापूर्वी इतर कोणत्याही योजनेमधून निधी प्राप्त झालेला नसावा.

**(अ) माहिती, शिक्षण व प्रसार आणि जन जागृतीः**

(१) उघडयावरील शौचविधी बंद करण्यासाठी, हाताने मैला उचलणाऱ्या सफाई कामगारांना या कामातून मुक्त करण्यासाठी, लोकांच्या वर्तनात बदल घडवून आणून त्यांच्या मानसिकतेमध्ये बदल घडविण्यासाठी माहिती, शिक्षण, प्रसार व जनजागृती या माध्यमांचा वापर करण्यात यावा.

(२) रेडीओ, सोशल मिडिया, लघुपट, नाटके व कार्यशाळा इत्यादी माध्यमांमार्फत अभियानाची जनजागृती करण्यासाठी केंद्र शासन दरवर्षी एकूण नियतव्ययाच्या १२ टक्के निधी राज्यास उपलब्ध करून देणार आहे. तर, राज्य शासन केंद्र शासनाने उपलब्ध करून दिलेल्या निधीच्या २५ टक्के एवढा निधी उपलब्ध करून देईल.

(३) सदर निधीच्या विनियोगासाठी राज्याने आराखडा तयार करून राज्यास उपलब्ध होणाऱ्या एकूण निधीच्या ५० टक्के निधी राज्य शासनाच्या स्तरावर खर्च करण्यात येईल. तर, उर्वरित ५० टक्के निधी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना याबाबीवर खर्च करण्यासाठी वितरीत करण्यात येईल.

**(४)** या निधीमधून वर्तमानपत्रे व दुरदर्शन वरील जाहीराती राज्य शासनास अथवा नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना करता येणार नाहीत. तसेच, याबाबीसाठी उपलब्ध करून दिलेला निधी कोणत्याही परिस्थितीत वाहन खरेदी, इमारत बांधकाम, देखभाल व दुरूस्ती, पदे निर्मिती, वेतन व भत्ते व फर्निचर खरेदी यासाठी वापरता येणार नाही.

**(इ) क्षमता बांधणी आणि प्रशासकीय व कार्यालयीन खर्च:**

(१) क्षमता बांधणी आणि प्रशासकीय व कार्यालयीन खर्च यासाठी केंद्र शासन दरवर्षी एकूण नियतव्ययाच्या ३ टक्के निधी उपलब्ध करून देणार आहे. तर, राज्य शासन केंद्र शासनाने उपलब्ध करून दिलेल्या निधीच्या २५ टक्के एवढा निधी उपलब्ध करून देईल.

(२) सदर निधीच्या विनियोगासाठी राज्याने व्यापक क्षमता बांधणी उपक्रम हाती घेवून राज्यास उपलब्ध होणाऱ्या एकूण निधीच्या ५० टक्के निधी राज्य शासनाच्या स्तरावर खर्च करण्यात येईल. तर, उर्वरित ५० टक्के निधी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना याबाबीवर खर्च करण्यासाठी वितरीत करण्यात येईल.

(३) राज्य स्तरावरील प्रकल्प व्यवस्थापन कक्षाचा, तसेच शहर स्तरावरील कार्यक्रम अंमलबजावणी कक्षाचा खर्च यामधून अनुज्ञेय आहे.

(४) याबाबीसाठी उपलब्ध करून दिलेला निधी कोणत्याही परिस्थितीत वाहन खरेदी, इमारत बांधकाम, देखभाल व दुरूस्ती, पदे निर्मिती, वेतन व भत्ते व फर्निचर खरेदी यासाठी वापरता येणार नाही.

३.४ **अभियानाचा नियतव्यय :**

या अभियान कालावधीत विविध घटकांवरील अंमलबजावणीसाठी केंद्र शासन राज्यास अंदाजे एकूण रू. १२१६.४० कोटी एवढा नियतव्यय उपलब्ध करून देणार आहे. तर, वैयक्तीक

घरगुती शौचालयाचे बांधकामासाठी देण्यात येणारे अनुदान वगळता उर्वरित घटकांसाठी राज्य शासनही केंद्र शासनाने उपलब्ध करून दिलेल्या नियतव्ययाच्या किमान २५ % एवढा नियतव्यय उपलब्ध करून देणार आहे. वैयक्तीक घरगुती शौचालय बांधकामासाठी वरील परिच्छेद ३.३(अ) (२) व (३) मध्ये नमूद केल्यानुसार राज्य शासनाचे अनुदान उपलब्ध करून दिले जाणार आहे. या अभियानासाठीचा उर्वरित निधी पुढील अन्य स्रोतांमधून उपलब्ध करून घेता येईल. ते निधीचे स्रोत पुढील प्रमाणे आहेत:

१) खाजगी क्षेत्राचा सहभाग (Private Sector Participation)
२) राज्य सरकार / नागरी स्थानिक स्वराज्य संस्था यांच्याद्वारे अतिरिक्त साधने (Additional Resources from State Government /ULB)
३) लाभार्थ्यांचा सहभाग (Beneficiary Share)
४) वापरकर्ता शुल्क (Users Charges )
५) जमीन लिवरेजिंग (Land Leveraging )
६) अभिनव महसूल प्रवाह ( Innovative revenue streams )
७) स्वच्छ भारत कोष (Swachh Bharat Kosh)
८) कॉर्पोरेट सामाजिक जबाबदारी ( Corporate Social Responsibility)
९) बाजारातील कर्ज (Market Borrowing)
१०) बाह्य सहाय्य (External Assistance)

**३.५ संस्थात्मक रचना :**

**(अ) राज्यस्तर:**

**(१) राज्य नियामक मंडळ: मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली पुढील प्रमाणे राज्य नियामक मंडळ गठित करण्यास मान्यता देण्यात येत आहे:-**

| | |
|---|---|
| १)मा. मुख्यमंत्री | अध्यक्ष |
| २)मा. मंत्री, वित्त व नियोजन | सदस्य |
| ३) मा. मंत्री, महिला व बाल विकास | सदस्य |
| ४)मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता | सदस्य |
| ५)मा. मंत्री. उद्योग | सदस्य |
| ६)मा. राज्यमंत्री, नगर विकास | सदस्य |
| ७)मा. मुख्यसचिव | सदस्य |
| ८) मा. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता | सदस्य |

| | |
|---|---|
| ९) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद संचालनालय | सदस्य |
| १०) अध्यक्ष, अखिल भारतीय स्थानिक स्वराज्य संस्था | सदस्य |
| ११) राज्य अग्रणी बँक अधिकारी | सदस्य |
| १२) महानगरपालिका महापौर : प्रतिनिधी | सदस्य |
| १३) नगर परिषद अध्यक्ष : प्रतिनिधी | सदस्य |
| १४) महाराष्ट्र चेंबर ऑफ कामर्स व इंडस्ट्रीज अॅड अॅग्रीकल्चर प्रतिनिधी | सदस्य |
| १५) सचिव (नवि-२) | सदस्य-सचिव |
| १६) राज्य अभियान संचालक स्वच्छ भारत अभियान | सदस्य |

१७) या व्यतिरिक्त समितीचे अध्यक्ष यांना आवश्यक वाटल्यास इतर सदस्य / सदस्यांची नेमणूक करू शकतील किंवा कोणत्याही बैठकीस इतर विषेशतज्ञ यांना निमंत्रित करू शकतील.

महानगरपालिकांच्या महापैरांचा प्रतिनिधी व नगरपालिकांच्या अध्यक्षांचा प्रतिनिधी निवडण्याचे संपूर्ण अधिकार समितीचे अध्यक्षांना राहतील

**सदर समितीची कार्यकक्षा:**

१) अभियानाच्या अंमलबजावणीसाठी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीस व सचिव (नवि-२) यांच्या अध्यक्षतेखालील सनियंत्रण व अमंलबजावणी समितीस वेळोवेळी मार्गदर्शन करणे.

२) अभियानाचे समन्वय व संनियंत्रण करण्याकरिता अभियानाच्या अंमलबजावणीचा सहामाही अथवा आवश्यकतेनुसार आढावा घेणे.

**(२) उच्चाधिकार समिती :**

केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांमधील परिच्छेद ११.२.१ मध्ये नमूद केल्यानुसार अभियानाच्या व्यवस्थापनासाठी पुढील प्रमाणे उच्चाधिकार समिती गठित करण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

| | |
|---|---|
| १) मा. मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २) मा. अ.मु.स. (वित्त) | सदस्य |
| ३) मा. प्रधान सचिव (नियोजन) | सदस्य |
| ४) मा. प्रधान सचिव (सामाजिक न्याय) | सदस्य |
| ५) मा.सचिव (आदिवासी विकास) | सदस्य |
| ६) मा.प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता) | सदस्य |
| ७) मा. सचिव, (नवि-२) नगर विकास विभाग | सदस्य |
| ८) केंद्र शासनाच्या नगर विकास मंत्रालयाचा प्रतिनिधी | सदस्य |
| ९) राज्य अभियान संचालक, स्वच्छ भारत अभियान | सदस्य - सचिव |

**सदर समितीची कार्यकक्षा:**

१) राज्य स्वच्छता धोरणास आणि शहर स्वच्छता आराखडयास मान्यता देणे.

२) सनियंत्रण व अंमलबजावणी समितीने खालील बाबींसाठी तयार केलेल्या सल्लागारांच्या पॅनलला मान्यता देणे:

(अ) स्वच्छ महाराष्ट्र अभियानांतर्गत सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करणे.

(ब) प्रकल्पाचा आढावा व सनियंत्रणाकरिता प्रयत्न सल्लागारांची नियुक्ती करणे.

(क) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या सविस्तर प्रकल्प अहवालाचे मुल्यमापन करणे.

३) संनियंत्रण अंमलबजावणी समितीने शिफारस केलेल्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या प्रकल्पांना मंजूरी देणे.

४) अतिरिक्त स्त्रोताच्या जमवाजमवीची योजना आखणे.

५) लहान, मध्यम आणि दीर्घकालीन निधीच्या प्रवाहाची योजना आखणे.

६) प्रकल्पांसाठी केंद्र शासनाच्या हिश्याचा निधी वितरित करण्यासाठी संनियंत्रण अंमलबजावणी समितीने सादर केलेल्या प्रस्तावाची केंद्र शासनास शिफारस करणे.

७) अभियानांतर्गच्या वार्षिक कृती आराखडयानुसार क्षमता निर्मिती, आयईसी, आणि जनजागृती इ. च्या प्रगतीचा वेळोवेळी आढावा घेऊन अहवाल राज्य नियामक मंडळास सादर करणे.

८) अभियानाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी अन्य कोणतीही बाब किंवा स्वच्छ भारत अभियाना संदर्भात केंद्रिय अभियान संचालनालयाने संदर्भ केलेली बाब.

९) सदर समितीची बैठक आवश्यकतेनुसार वेळोवेळी घेण्यात यावी. परंतु तीन महिन्यात किमान एक बैठक घेण्यात यावी.

**(३) संनियंत्रण व अंमलबजावणी समिती:**

सचिव (नवि-२) यांच्या अध्यक्षतेखाली पुढील प्रमाणे संनियंत्रण व अंमलबजावणी समिती गठित करण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

| | |
|---|---|
| १) सचिव (नवि-२) नगर विकास विभाग | अध्यक्ष |
| २) अपर मुख्य सचिव (वित्त) यांचा प्रतिनिधी | सदस्य |
| ३) प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग | सदस्य |
| ४) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता | सदस्य |
| ५) प्रधान सचिव, महिला व बालविकास | सदस्य |
| ६) आयुक्त तथा संचालक, नगरपालिका प्रशासन | सदस्य |
| ७) महासंचालक, अखिल भारतीय स्थानिक स्वराज्य संस्था | सदस्य |
| ८)राज्य अभियान संचालक, स्वच्छ भारत अभियान (नागरी) | सदस्य-सचिव |

**सदर समितीची कार्यकक्षा:**

१) राज्य स्वच्छता धोरण आणि शहर स्वच्छता आराखडा तयार करणे, ऑनलाइन प्रकाशित करणे.
२) नागरी स्वच्छतेच्या स्थिती बाबतीची संकल्पना टिपणी तयार करून त्याबाबत उचित कार्यवाही करणे.

३) पुढील बाबींसाठी सल्लागारांचे पॅनेल तयार करून उच्चाधिकार समितीच्या मान्यतेसाठी सादर करणे :

(अ) स्वच्छ महाराष्ट्र अभियानांतर्गत सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करणे.
(ब) प्रकल्पाचा आढावा व सनियंत्रणाकरिता प्रयत्न सल्लागारांची नियुक्ती करणे.
(क) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या सविस्तर प्रकल्प अहवालाचे मुल्यमापन करणे.

४) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी शिफारस केलेले नागरी घन कचरा व्यवस्थापनाच्या प्रकल्पांना मंजूरी देण्यासाठी उच्चाधिकार समितीपुढे सादर करणे.
५) लहान, मध्यम आणि दीर्घकालीन निधीच्या प्रवाहाची योजना आखणे.
६) केंद्र शासनाच्या हिश्याचा निधी वितरित करण्यासाठीचे प्रस्ताव उच्चाधिकार समितीपुढे सादर करणे.

७) अभियानांतर्गत मंजूर झालेल्या प्रकल्पांची फलनिष्फती आणि देखभालीची व्यवस्था पाहणे.

८) अभियानांतर्गत वार्षिक कृती आराखडयानुसार क्षमता निर्मिती, आयईसी, आणि जनजागृती इ. च्या प्रगतीचा आढावा उच्चाधिकार समितीपुढे सादर करणे.

९) वितरीत निधीचे वेळोवळी लेखापरिक्षण करणे, विविध लेखा परिक्षण अहवालावरील कार्यवाहीच्या अहवालाचा आढावा घेणे.

१०) सदर समितीची बैठक आवश्यकतेनुसार वेळोवेळी घेण्यात यावी परंतु, तीन महिन्यात किमान एक बैठक घेण्यात यावी.

(५) **स्वच्छ भारत अभियानासाठी (नागरी) राज्य अभियान संचालनालय:**

केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांमधील परिच्छेद ११.२.२ मध्ये नमूद केल्यानुसार, या अभियानाच्या अंमलबजावणीसाठी राज्यस्तरावर "राज्य अभियान संचालनालय" नव्याने निर्माण करून त्यासाठी मंत्रालयातील सह सचिव / उप सचिव दर्जाचे राज्य अभियान संचालकांचे पद निर्माण करण्यास व संचालनालयांतर्गत प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (Project Management Unit (PMU) कार्यरत करण्यास संदर्भिय क्रमांक (२) येथील शासन निर्णय, नगर विकास विभाग, शासन निर्णय, क्रमांक स्वभाअ २०१५/ प्र.क्र.२३/ नवि ३४ दिनांक २४ एप्रिल, २०१५ अन्वये स्वतंत्रपणे मान्यता देण्यात आली आहे.

(ब) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थास्तर: घन कचरा व्यवस्थापन आणि स्वच्छता यासाठी स्वच्छ भारत अभियान / स्वच्छ महाराष्ट्र अभियान एक लोक चळवळ (जन आंदोलन) म्हणून देशभरात व राज्यात राबविण्यात यावे. या अभियानाची अंमलबजावणी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी प्रभाग समिती, क्षेत्र सभा, निवासी कल्याण संघ, स्वयंसेवी संस्था आणि सिव्हिल सोसायटीचे गट यांच्या सक्रिय सहभागाने व स्वच्छता दूतां मार्फत करावी.

४. या अभियानाच्या सूलभ अंमलबजावणीसाठी व अडचणी दूर करण्यासाठी शासन वेळोवेळी आदेश निर्गमित करील व या आदेशांचे पालन करणे सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना बंधनकारक राहील.

५. या अभियानाच्या अंमलबजावणीसाठी केंद्र व राज्य शासनाच्या निधीचा हिस्सा उपलब्ध करण्याकरीता पुढील प्रमाणे लेखाशिर्ष उघडण्यास मान्यता देण्यात येत आहे. या लेखाशिर्षाखाली आवश्यकता व उपलब्धता यानुसार निधीची तरतूद करण्यात येईल.

(१) मागणी क्र. एफ- २

मुख्य लेखाशीर्ष- २२१७, नगरविकास
(८०) सर्वसाधारण
१९१, महानगरपालिकांना सहाय्य
(००) (७६) स्वच्छ भारत अभियानांतर्गत महानगरपालिकांना सहाय्य (केंद्र हिस्सा)
३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)
(२२१७९७५२) योजनांतर्गत

(२) मागणी क्र. एफ- २
मुख्य लेखाशीर्ष- २२१७, नगरविकास
(८०) सर्वसाधारण
१९२, नगरपरिषदांना सहाय्य
(००) (१४) स्वच्छ भारत अभियानांतर्गत नगरपरिषदांना सहाय्य (केंद्र हिस्सा)
३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)
(२२१७९७७९) योजनांतर्गत

(३) मागणी क्र. एफ- २
मुख्य लेखाशीर्ष- २२१७, नगरविकास
(८०) सर्वसाधारण
१९३, नगरपंचायतींना सहाय्य
(००) (०३) स्वच्छ भारत अभियानांतर्गत नगरपंचायतींना सहाय्य (केंद्र हिस्सा)
३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)
(२२१७ ९७९७) योजनांतर्गत

(४) मागणी क्र. एफ- २
मुख्य लेखाशीर्ष- २२१७, नगरविकास
(८०)  सर्वसाधारण
१९१, महानगरपालिकांना सहाय्य
(००) (७७) स्वच्छ भारत अभियानांतर्गत महानगरपालिकांना सहाय्य (राज्य हिस्सा)
३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)
(२२१७९७६१) योजनांतर्गत
(५) मागणी क्र. एफ- २
मुख्य लेखाशीर्ष- २२१७, नगरविकास
(८०)  सर्वसाधारण
१९२, नगरपरिषदांना सहाय्य
(००)(१५) स्वच्छ भारत अभियानांतर्गत नगरपरिषदांना सहाय्य (राज्य हिस्सा)
०१. वेतन
०६. दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क
११. देशांतर्गत प्रवास खर्च
१३. कार्यालयीन खर्च
१७. संगणक खर्च
३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)
(२२१७९७८८) योजनांतर्गत
(६) मागणी क्र. एफ- २
मुख्य लेखाशीर्ष- २२१७, नगरविकास
(८०)  सर्वसाधारण
१९३, नगरपंचायतींना सहाय्य
(००) (०४) स्वच्छ भारत अभियानांतर्गत नगरपंचायतींना सहाय्य (राज्य हिस्सा)
३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)
(२२१७९८०३) योजनांतर्गत

५. सदरचा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनै.सं.क्र. ८३/१४४४ दिनांक २७.२.२०१५ व क्रमांक युओआर १२२/ व्यय-३ दिनांक ७.३.२०१५ अन्वये प्राप्त अभिप्रायांचा विचार करून व राज्य मंत्रिमंडळाने दिनांक १९.३.२०१५ रोजी घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१५१८०५२०३५२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhakar Dnyandeo Bobade

Digitally signed by Sudhakar Dnyandeo Bobade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2e4705465b9bdfd5b38b2d36aae8365 9869796cb8cc2aefbc550989feec27db1, cn=Sudhakar Dnyandeo Bobade
Date: 2015.05.15 18:09:01 +05'30'

**(सुधाकर ज्ञा. बोबडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री, वित्त व नियोजन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मंत्री, उद्योग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. मंत्री, यांचे खाजगी सचिव (उर्वरीत सर्व), मंत्रालय, मुंबई.
८. मा. राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. राज्यमंत्री सर्व विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता, मंत्रालय, मुंबई

१४. प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. प्रधान सचिव (नगर विकास-१), मंत्रालय, मुंबई.
१७. सचिव (नगर विकास-२), मंत्रालय, मुंबई.
१८. आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, वरळी,मुंबई.
१९. सचिव, आदिवासी विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. महासंचालक, अखिल भारतीय स्थानिक स्वराज्य संस्था.
२१. महासंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई.
२३. महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
२४. सर्व विभागीय आयुक्त.
२५. सर्व जिल्हाधिकारी.
२६. उप सचिव (अर्थसंकल्प), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२७. आयुक्त, सर्व महानगरपालिका.
२८. मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा/ नगर पंचायती.
२९. निवडनस्ती (नवि-३४).